**शासकीय व शासन अनुदानित शाळांमधील हुशार व गरजू विद्यार्थ्यांसाठी JEE व NEET या प्रवेश परीक्षांची तयारी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन परिपत्रक : क्रमांकः सी एस आर. ४३१६/प्र.क्र.११०/१६ प्रशिक्षण.**

**मंत्रालय, मुंबई ४०००३२,**

**दिनांक: ०१ ऑगस्ट, २०१८**

प्रस्तावना:

दक्षणा फाऊंडेशन, मागील ८ वर्षा पासून इयत्ता १२ वी विज्ञान शाखेमध्ये शिकत असलेल्या हुशार व गरीब विद्यार्थ्यांसाठी **–JEE व NEET॰** या प्रवेश परीक्षांची १२ वी नंतर एक वर्ष नि:शुल्क तयारी करुन घेतात. सदर उपक्रमासाठी देशभरातून विद्यार्थी प्रवेश घेतात. तथापि, या उपक्रमासाठी राज्यातून म्हणावा तसा प्रतिसाद मिळत नाही. राज्यातील खूपच कमी विद्यार्थी सदर उपक्रमासाठी येतात. त्यामुळे राज्यातील मुलांना सदर उपक्रमाचा जास्तीत जास्त फायदा घेता यावा म्हणून या उपक्रमाची माहिती शाळापर्यंत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. या उपक्रमाची माहिती विद्यार्थ्यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :** दक्षणा फाऊंडेशन, पुणे व शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांच्यामध्ये दिनांक ५ नोव्हेंबर २०१६ रोजी करार (MOU) करण्यात आला आहे. त्यानुसार दक्षणा फाऊंडेशन, कडूस, ता. राजगुरुनगर (खेड), पुणे ही संस्था राज्यातील शाळेतील हुशार व गरजू विद्यार्थ्यांसाठी **–JEE व NEET॰** या प्रवेश परीक्षांची तयारी करुन घेण्यासाठी शाळांमधून हुशार व गरजू विद्यार्थ्यांची **दक्षणा प्रवेश परीक्षा** घेऊन त्यामधून निवड करण्यात येते. या उपक्रमाची माहिती राज्यातील सर्व हुशार व गरजू विद्यार्थ्यांना उपलब्ध करुन देण्यासाठी खालील प्रमाणे कार्यपद्धती निश्चित करण्यात आलेली आहे.

१. दक्षणा प्रवेश परीक्षा (Selection test) दर वर्षी माहे जानेवारी मध्ये घेण्यात येते.
२. ज्या विद्यार्थ्यांच्या पालकांचे वार्षिक उत्पन्न १.५० लक्ष पर्यंत आहे व ज्या विद्यार्थ्यांना १० वी मध्ये गणित व विज्ञान या विषयामध्ये ७०% किंवा त्यापेक्षा अधिक गुण मिळाले आहेत असे विद्यार्थी या परीक्षेसाठी प्रवेश घेऊ शकतात.
३. सदर परीक्षेसाठी शासकीय शाळा / १०० % शासकीय अनुदानीत खाजगी शाळेतील इयत्ता १२ वी विज्ञान शाखेमध्ये शिकत असलेले विद्यार्थीच बसू शकतात.
४. १२ वी विज्ञान शाखेची परीक्षा झाल्यानंतर निवड झालेल्या विद्यार्थ्यांसाठी हा उपक्रम एक वर्षाचा निवासी असून राहणे व भोजनाचा सर्व खर्च दक्षणा फाऊंडेशन मार्फत करण्यात येतो.
५. जिल्ह्यातील प्रत्येक शाळांमधून नामनिर्देशित विद्यार्थ्यांची यादी प्राप्त झाल्यानंतर दक्षणा फाऊंडेशन कडून निवड यादी प्रकाशित करुन विद्यार्थ्यांना http://www.dakshana.org या संकेत स्थळावर नोंदणी करण्याचे आवाहन करण्यात येईल.

६. दक्षणा फाऊंडेशन प्रत्येक जिल्ह्यामध्ये घ्यावयाच्या प्रवेश परीक्षेसाठी चाचणी केंद्र नियुक्त करेल व या प्रत्येक चाचणी केंद्रामध्ये कमीत कमी १०० विद्यार्थी (५ वर्गामध्ये प्रत्येकी २० विद्यार्थी यानुसार) असतील.

७. चाचणी केंद्रावर पर्यवेक्षक त्याचबरोबर प्रवेश परीक्षेसाठी लागणारे परीक्षा साहित्य दक्षणा फाऊंडेशन यांच्यावतीने पुरविण्यात येईल.

८. शाळांमधून नामनिर्देशित विद्यार्थ्यांची यादी दक्षणा फाऊंडेशनला jdst@dakshana.org या ई-मेल वर पाठविण्यात यावी. त्याचप्रमाणे आवश्यकता भासल्यास सदर उपक्रमाबाबत अधिक माहिती करीता ७७९८७८६४०५या दूरध्वनी क्रमांकावर संपर्क करु शकता.

९. सदर उपक्रमाची माहिती शासकीय शाळा / १००% शासकीय अनुदानीत खाजगी शाळेतील इयत्ता १२ वी विज्ञान शाखेमध्ये शिकत असलेल्या विद्यार्थ्यांपर्यंत उपलब्ध होईल याची शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे, विभागीय शिक्षण उपसंचालक व शिक्षणाधिकारी, माध्यमिक यांनी वर नमूद केलेल्या शाळेतील मुख्याध्यापकांमार्फत कळविण्याची दक्षता घेण्यात घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०८०११५१६५१८३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2018.08.01 15:21:17 +05'30'

**(बी. आर. माळी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. मा.मंत्री,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,यांचे विशेष कार्य अधिकारी.
३. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव.
४. मा.प्रधान सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई
५. मा.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
६. अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
७. शिक्षण संचालक (माध्यमिक) , महाराष्ट्र राज्य, पुणे .
८. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, (विद्याप्राधिकरण) पुणे
९. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
१०. सर्व शिक्षणाधिकारी.
११. निवड नस्ती, प्रशिक्षण